वितरण आदेश क्रमांक: १२
कोषागारातून रोख रक्कम देय अनुदान
२०१४-२०१५.

पंचायत राज संस्थांना केंद्र पुरस्कृत १३ व्या वित्त आयोगांतर्गत जनरल परफॉर्मन्स ग्रँटच्या सन २०१३-१४ च्या दुसऱ्या हप्त्याच्या स्वरुपात प्राप्त झालेल्या अनुदानाचे वितरण.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तेविआ-२०१४/प्र.क्र ६४/ वित्त-४.**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
तारीख: **३ डिसेंबर, २०१४.**

वाचा -

**१. शासन निर्णय क्रमांकः तेविआ-२०१०/प्र.क्र.२२ / वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ३० /८/२०१०.**
**२. शासन परिपत्रक क्रमांकः तेविआ-२०१०/प्र.क्र. २२ / वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ३० ऑगस्ट,२०१०.**
**३. शासन पत्र क्रमांकः तेविआ-२०१०/प्र.क्र.४३/वित्त -४,दिनांक ७ फेब्रुवारी,२०११.**
**४. शासन परिपत्रक क्रमांकः तेविआ-२०११/प्र.क्र.८२ / वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ९ डिसेंबर,२०११.**
**५. शासन निर्णय क्रमांक: तेविआ-२०१४/प्र.क्र.२१/वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई-४०००३२,दिनांक: ५ एप्रिल,२०१४.**
**६. शासन निर्णय क्रमांक: तेविआ-२०१३/प्र.क्र.१४/वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई-४०००३२,दिनांक: २६ सप्टेंबर,२०१४.**
**७. शासन निर्णय क्रमांक: तेविआ-२०१४/प्र.क्र.५४/वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई-४०००३२,दिनांक:२० ऑक्टोबर,२०१४.**

प्रस्तावना -

१३ व्या वित्त आयोगांतर्गत जनरल परफॉर्मन्स ग्रँटच्या स्वरुपात केंद्र शासनाकडून **सन २०१३-१४** च्या दुसऱ्या हप्त्यापोटी **रु.२८७.१५३६ कोटी** इतका निधी राज्यास प्राप्त झाला असून, तो निधी सर्व पंचायत राज संस्थांना जिल्हा परिषद/पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरासाठी १०:२०:७० या प्रमाणात **सन २०१४-१५** या आर्थिक वर्षात वितरीत करावयाचा आहे. त्यानुसार शासनाने खालील निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय -

या शासन निर्णयान्वये १३ व्या वित्त आयोगाचा **सन २०१३-१४** या वित्तीय वर्षाचा जनरल परफॉर्मन्स ग्रँटच्या स्वरुपातील दुसऱ्या हप्त्याचा **रु.२८७.१५३६ कोटी** इतका निधी सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे सर्व जिल्हा परिषदांना (जि.प./पं.स./ग्रा.पं. स्तरासाठी) **अनुक्रमे १०:२०:७०** या प्रमाणात वितरीत करण्यात येत आहे. जिल्हा परिषद/पंचायत समिती/ग्रामपंचायत स्तरासाठी विवरण पत्रात दर्शविल्याप्रमाणे देय असलेला निधी अनुक्रमे **(२५१५ १९४४) , (२५१५ २००२) , (२५१५ १९६२)** या स्वतंत्र लेखाशीर्षाखाली,जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (बीम्सवर) वितरीत करण्यात येत आहे.

२ सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी जिल्हा परिषद/पंचायत समिती/ग्रामपंचायत स्तरासाठीचा वितरीत निधी त्या त्या स्तरासाठीच्या स्वतंत्र लेखाशीर्षाखाली, अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (बीम्सवर) प्राप्त झाल्यानुसार, कोषागारातून तात्काळ आहरीत करावा व तीनही स्तरासाठीचा आहरीत केलेला सर्व निधी तेराव्या वित्त आयोगासाठी जिल्हा परिषद स्तरावर उघडण्यात आलेल्या खात्यात जमा करावा.

३. त्यानंतर सदर जिल्हा परिषद स्तरासाठीचा निधी, जिल्हा परिषद स्तरावर ठेवण्यात यावा. पंचायत समिती स्तरासाठीचा निधी हा पंचायत समिती स्तरासाठीच्या निधीचे वितरण करण्यासाठी **संदर्भ क्र.१** च्या शासन निर्णयात नमूद निकषांनुसार वितरीत करावा.

४. तसेच, ग्रामपंचायत स्तरासाठीच्या निधीचे जिल्ह्यातील सर्व ग्रामपंचायतींना वितरण करण्यासाठी, ग्रामपंचायतींना निधी वितरण करण्यासाठी **संदर्भ क्र.१** च्या शासन निर्णयातील **ब (IV)** मध्ये दिलेल्या विहीत निकषात खालील**"अ"**नुसार बदल करून निधीचे प्रगणन (Calculation) करावे.

(अ) **निकष क्र.(८)** ग्राम रचना आराखडा मंजूर असलेल्या ग्रामपंचायती (D.P.Plan) चे ५ टक्के प्रमाण, शासनाने ठरवून दिलेल्या मॉडेल अकौंटींग सिस्टिममध्ये लेखे ठेवण्याच्या (Model Accounting System-MAS/PRIAsoft) अंमलबजावणीसाठी असलेल्या १० टक्के प्रमाणात समाविष्ट करुन त्यानुसार ग्रामपंचायतींना वितरीत करावयाच्या निधीचे प्रगणन करावे.

५. मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरासाठी वितरीत करावयाच्या निधीचे उपरोक्त सूचनांनुसार प्रगणन करुन पंचायत समिती व ग्रामपंचायतींना देय असणारा निधी ५ ते १० दिवसाचे आत इ.सी.एस. (Electronic Clearance System)./एन.इ.एफ.टी (National Electronic Fund Transfer) किंवा आर.टी.जी.एस (Real Time Gross Settlement) यापैकी उपलब्ध असलेल्या बँकिंग सिस्टीमद्वारे, जिल्ह्यातील सर्व पंचायत समित्या व सर्व ग्राम पंचायतींच्या खात्यावर वर्ग करावा. निधी वर्ग करण्यास ५ ते १० दिवसांपेक्षा जास्त विलंब झाल्यास त्या विलंबाबाबत भारतीय रिझर्व बँकेच्या दराने त्या रकमेचे व्याजही पंचायत समिती व ग्रामपंचायतींना आपणास द्यावे लागेल, याची आपण नोंद घ्यावी.

६. या वितरण आदेशानुसार प्राप्त निधीचा विनियोग **दि.३१ मार्च, २०१५** च्या आंत करावयाचा आहे. निधी विहित वेळेत खर्च करण्याची जबाबदारी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तसेच

संबंधित गट विकास अधिकारी, पंचायत समिती व ग्रामसेवक / ग्राम विकास अधिकारी, ग्रामपंचायत यांची राहील. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी पंचायत राज संस्थांच्या तीनही स्तरावर झालेल्या खर्चाचा आढावा प्रत्येक महिन्यात घ्यावा व हा निधी शासनाने मंजूर केलेल्या प्रयोजनासाठी व विहित वेळेत खर्च करण्याच्या दृष्टीने योग्य अशा उपाययोजना कराव्यात.

७. सदर निधी खर्च करताना १३ व्या वित्त आयोगांतर्गत या वितरण आदेशान्वये मंजूर केलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच कामाचे नियोजन करुन निधी खर्च करावा. मंजूर अनुदानापेक्षा जास्तीचे दायित्व निर्माण करु नये. १३ व्या वित्त आयोगांतर्गत प्रत्यक्षपणे प्राप्त होणा-या निधीच्या मर्यादेतच निधी खर्च करण्याबत **संदर्भ क्र. ४** च्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना सर्व संबंधितांनी विचारात घ्याव्यात. तसेच, निधी खर्च करताना सर्व संदर्भिय शासन निर्णयात व या शासन निर्णयात दिलेल्या सूचनांचे तंतोतंत पालन करुनच, निधी खर्च करावा. निधी विहित वेळेत खर्च न झाल्यास त्याची सर्व जबाबदारी अंतिमत: मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील व त्याची नोंद त्यांच्या गोपनीय अहवालात घेण्यात येईल.

८. विवरणपत्रात दर्शविलेला जनरल परफॉर्मन्स ग्रँटच्या स्वरुपात जिल्हा परिषद स्तरासाठी वितरीत केलेला निधी **२५१५ १९४४** या लेखाशीर्षाखाली, पंचायत समिती स्तरासाठी वितरीत केलेला निधी **२५१५ २००२** या लेखाशीर्षाखाली व ग्रामपंचायत स्तरासाठी वितरीत केलेला निधी **२५१५ १९६२** या लेखाशीर्षाखाली, **सन २०१४-१५** च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून वितरीत करण्यात येत असून, हा निधी खर्च करण्यास शासनातर्फे मान्यता देण्यात येत आहे. या निधीतून बाबनिहाय झालेल्या खर्चाची माहिती, **संदर्भ क्र.३** नुसार दिलेल्या विहित विवरणपत्रानुसार पुढील प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता आपल्या विभागाच्या उपायुक्त (विकास) यांचे कार्यालयास व शासनास सादर करावी. तसेच, निधीच्या खर्चाचे अंतिम उपयोगिता प्रमाणपत्र व आर्थिक/ भौतिक अहवालही त्यासोबत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास पाठविण्यात यावा.

९. जिल्हा परिषद स्तरासाठी वितरीत निधीतून होणारा खर्च **मागणी क्र.एल-३, २५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९६ - जिल्हा परिषद/जिल्हा स्तरीय पंचायतीस सहाय्य, (००) (०२) १३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार पंचायत राज संस्थांना विविध विकास योजनांसाठी अनुदाने (योजनेतर) (२५१५ १९४४) (जनरल परफॉर्मन्स ग्रँट), ३१ - सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची टाकावा.**

१०. पंचायत समिती स्तरासाठी वितरीत निधीतून होणारा खर्च **मागणी क्र.एल-३, २५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९७ - पंचायत समितीस सहाय्य, (००) (०२) १३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार पंचायत राज संस्थांना विविध विकास योजनांसाठी अनुदाने (योजनेतर) (२५१५ २००२) (जनरल परफॉर्मन्स ग्रँट), ३१ - सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची टाकावा.**

११. ग्रामपंचायत स्तरासाठी वितरीत निधीतून होणारा खर्च **मागणी क्र.एल-३, २५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९८ - ग्रामपंचायतीस सहाय्य (००) (०३) १३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार पंचायत राज संस्थांना विविध विकास योजनांसाठी अनुदाने (योजनेतर)(२५१५ १९६२)**

**(जनरल परफॉर्मन्स ग्रँट), ३१ - सहाय्यक अनुदाने, या लेखाशिर्षाखाली सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची टाकावा.**

१२. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने अनौपचारिक संदर्भ क्र.१६३/२०१४/ वि.आ.कक्ष, दिनांक ३/१२/२०१४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२०१४१२०३११००१३३३२०** असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASUDEO MAYA ROOP

Digitally signed by VASUDEO MAYA ROOP
DN: CN = VASUDEO MAYA ROOP, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GAD,CID - 916989
Reason: I am approving this document
Date: 2014.12.04 14:17:54 +05'30'

**मा. रु. वासुदेव**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष.
महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ (लेखापरीक्षा),मुंबई/नागपूर (पाच जादा प्रतीसह).
सर्व विभागीय आयुक्त(महसूल)/ सर्व उपायुक्त (विकास).
संचालक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य,कोकण भवन ,नवी मुंबई.
सहसंचालक, स्थानिक निधी लेखा, (सर्व विभाग).
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत).
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
वित्त विभाग का.क्र.(व्यय-१५/अर्थोपाय/वित्त आयोगकक्ष/अर्थसंकल्प-१७),मंत्रालय,मुंबई- ३२.
मा.प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहाय्यक.
कक्ष अधिकारी,कार्यासन क्र.वित्त-१/वित्त-७/वित्त-८/संग्राम कक्ष, ग्राम विकास विभाग.
निवड नस्ती का.क्र.वित्त-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

## जनरल परफॉर्मन्स ग्रँट

## वितरण आदेश क्र.१२ तेविआ-२०१४/प्र.क्र.६४/वित्त-४ ,दिनांक ३/१२/२०१४ चे विवरणपत्र

(रू.हजारात)

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | जिल्हा परिषद | पंचायत समिती | ग्रामपंचायत | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | ठाणे | १०२०० | २०४०० | ७१४०० | **१०२०००** |
| २ | रायगड | ७०११ | १४०२२ | ४९०७७ | **७०११०** |
| ३ | रत्नागिरी | ६७३२ | १३४६४ | ४७१२५ | **६७३२१** |
| ४ | सिंधुदूर्ग | ४८४७ | ९६९४ | ३३९३० | **४८४७१** |
| ५ | नाशिक | १४३१५ | २८६३० | १००२०५ | **१४३१५०** |
| ६ | धुळे | ७९१० | १५८२० | ५५३७० | **७९१००** |
| ७ | नंदूरबार | ९०५४ | १८१०८ | ६३३७८ | **९०५४०** |
| ८ | जळगाव | ११२५४ | २२५०८ | ७८७७८ | **११२५४०** |
| ९ | अहमदनगर | १३९१७ | २७८३४ | ९७४१९ | **१३९१७०** |
| १० | पुणे | १३०५८ | २६११६ | ९१४०६ | **१३०५८०** |
| ११ | सातारा | ९८२० | १९६४० | ६८७४० | **९८२००** |
| १२ | सांगली | ८८७४ | १७७४८ | ६२११८ | **८८७४०** |
| १३ | सोलापूर | ११८९१ | २३७८२ | ८३२३७ | **११८९१०** |
| १४ | कोल्हापूर | ९८२० | १९६४० | ६८७४० | **९८२००** |
| १५ | औरंगाबाद | ८५५९ | १७११८ | ५९९१३ | **८५५९०** |
| १६ | जालना | ७५५२ | १५१०४ | ५२८६४ | **७५५२०** |
| १७ | परभणी | ६३७३ | १२७४६ | ४४६११ | **६३७३०** |
| १८ | हिंगोली | ५८७८ | ११७५६ | ४११४७ | **५८७८१** |
| १९ | बीड | ९१५१ | १८३०२ | ६४०५७ | **९१५१०** |
| २० | नांदेड | १०७४१ | २१४८२ | ७५१८७ | **१०७४१०** |
| २१ | उस्मानाबाद | ७३८७ | १४७७४ | ५१७०९ | **७३८७०** |
| २२ | लातूर | ८५९४ | १७१८८ | ६०१५८ | **८५९४०** |
| २३ | बुलढाणा | ९४३१ | १८८६२ | ६६०१७ | **९४३१०** |
| २४ | अकोला | ६००९ | १२०१८ | ४२०६३ | **६००९०** |
| २५ | वाशिम | ५९९० | ११९८० | ४१९३० | **५९९००** |
| २६ | अमरावती | ९५६० | १९१२० | ६६९२० | **९५६००** |
| २७ | यवतमाळ | १०५४१ | २१०८२ | ७३७८७ | **१०५४१०** |

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | जिल्हा परिषद | पंचायत समिती | ग्रामपंचायत | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| २८ | वर्धा | ५७८१ | ११५६२ | ४०४६८ | **५७८११** |
| २९ | नागपूर | ७९८९ | १५९७८ | ५५९२३ | **७९८९०** |
| ३० | भंडारा | ५६१९ | ११२३८ | ३९३३४ | **५६१९१** |
| ३१ | गोंदिया | ६२९४ | १२५८६ | ४४०५० | **६२९३०** |
| ३२ | चंद्रपूर | ८१२४ | १६२४९ | ५६८६८ | **८१२४१** |
| ३३ | गडचिरोली | ८८७८ | १७७५६ | ६२१४६ | **८८७८०** |
| | एकूण | **२८७१५४** | **५७४३०७** | **२०१००७५** | **२८७१५३६** |

VASUDEO MAYA ROOP

Digitally signed by VASUDEO MAYA ROOP
DN: CN = VASUDEO MAYA ROOP, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GAD,CID - 916989
Reason: I am approving this document
Date: 2014.12.04 14:18:36 +05'30'

मा. रु. वासुदेव
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.